# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन आदेश क्रमांकः एएससी-१५१६/प्र.क्र.२१७/१४-अ

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०२ ऑगस्ट, २०१७

<u>संदर्भ</u> - १) सा.प्र.वि.पत्र क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.४८/०४/१४-अ, दिनांक ७.६.२००४.
२) सा.प्र.वि.पत्र क्र.संकीर्ण-१००७/प्र.क्र.११८/०७/१४-अ, दिनांक १३.९.२००७.
३) सा.प्र.वि. आदेश क्र.सीसीए-१७११/प्र.क्र.९३/२०११/१४-अ, दि.८.१२.२०११.

**-आदेश-**

मंत्रालयीन लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचा-यांना सन २०१६-२०१७ च्या निवडसूचीमधून सहायक कक्ष अधिकारी पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना रकाना क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या विभागात करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | श्री / श्रीमती | नांव | प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री | प्र.मो.केणी | विमाप्र | ग्रामविकास व जलसंधारण विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

२. लिपिक-टंकलेखकांना सहायक कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही तसेच त्यांनी संगणक अर्हता धारण केलेली आहे अथवा सदर अर्हता धारण करण्याची त्यांना सूट मिळालेली आहे या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

(अ) उपरोक्त तदर्थ पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दि.२८.११.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहील.

(ब) सदर तदर्थ पदोन्नती अकरा महिन्यांच्या कालावधीसाठी असेल तथापि, त्यानंतर सदरहू तदर्थ पदोन्नतीस मुदतवाढ देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र.संकीर्ण-१००७/ प्र.क्र.११८/०७/१४-अ, दिनांक १३.९.२००७ अनुसार संबंधित विभागामार्फत करण्यात यावी.

(क) सामान्य प्रशासन विभागाकडून नियमित निवडसूचीमध्ये सहायक कक्ष अधिकारी नियुक्त केल्यानंतर सदर तदर्थ पदोन्नती संपुष्टात येईल.

(ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित लिपिक-टंकलेखकांना नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा आणखी कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. सहायक कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यापुर्वी संबंधित मंत्रालयीन विभागाने लिपिक-टंकलेखकांचे जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्राबाबतची खातरजमा करण्यात यावी.

४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या लिपिक-टंकलेखकांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत लिपिक-टंकलेखकांनी पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे. त्यांच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०८०२१७३४५७३३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.08.02 17:37:07 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित लिपिक-टंकलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
२. सह सचिव / उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग
३. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.१४,१४-अ, १४-ब.
४. निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन १४-अ).

(संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत)